सन २०१८-१९ या वर्षातील (माहे ऑक्टोबर, २०१८ ते माहे सप्टेंबर,२०१९) या कालावधीतील पेयजल टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत ग्रामीण/नागरी भागात पाणी टंचाई निवारण कार्यक्रमासाठी राबविण्यात येत असलेल्या उपाययोजनांवरील खर्चासाठी रुपये २८९८८.३४ लक्ष इतका निधी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मदत व पुनर्वसन) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-०८/२०२०/प्र.क्र.५५/म-११,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- २१ ऑक्टोबर, २०२०.

वाचा:- १) महसूल व वन विभाग, शा. नि. क्र. एससीवाय-०६/२०१९/प्र.क्र.४०/म-११, दि. १९/६/२०१९.
२) महसूल व वन विभाग, शा. नि. क्र. एससीवाय-०६/२०१९/प्र.क्र.४०/म-११, दि.३०/१०/ २०१९.
३) महसूल व वन विभाग, शा.नि. क्र. एससीवाय-०६/२०१९/प्र.क्र.४०/म-११, दि. २५/२/२०२०..
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा, दि.८/७/२०२० रोजीचा प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या वर्षातील माहे ऑक्टोबर, २०१८ ते माहे सप्टेंबर, २०१९ या कालावधीतील, पेयजल टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत ग्रामीण/नागरी भागात पाणी टंचाई निवारण कार्यक्रमासाठी राबविण्यात येत असलेल्या पाणीपुरवठयाच्या विविध उपाययोजनांवरील खर्चासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने मागणी केल्यानुसार यापूर्वी संदर्भाधीन क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु.७७९३३.७१ लाख इतका निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आला. याच कालावधीतील, पाणीपुरवठयाच्या उपाययोजनांवरील खर्चासाठी पाणीपुरवठा विभागाने संदर्भ क्र.४ येथील प्रस्तावानुसार एकूण रुपये ३७१७५.६९ लक्ष इतक्या रकमेची मागणी केली. यानुषंगाने राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक १३/०८/२०२० रोजीच्या बैठकीत विचार होवून पाणीपुरवठा विभागास रुपये २८९८८.३४ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. यास अनुसरुन, पाणीपुरवठा विभागास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षातील माहे ऑक्टोबर, २०१८ ते माहे सप्टेंबर,२०१९ या कालावधीतील, पेयजल टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत ग्रामीण/नागरी भागात पाणी टंचाई निवारण कार्यक्रमासाठी राबविण्यात येत असलेल्या पाणी पुरवठयाच्या विविध उपाययोजनांवरील खर्चासाठी राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार रुपये २८९८८.३४ लक्ष (अक्षरी रुपये दोनशे एकोणनव्वद कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष चौतीस हजार

फक्त) इतका निधी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०२०-२१ या चालू वित्तीय वर्षात मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य ०१, अवर्षण १०२, पिण्याचा पाण्याचा पुरवठा (९१), राज्य आपत्ती निधीच्या मानकांनुसार खर्च (९१)(०१), पिण्याचा पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ००९३) या उपशीर्षाखाली उपलब्ध निधीतून रुपये २८९८८.३४लक्ष (अक्षरी रुपये दोनशे एकोणनव्वद कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष चौतीस हजार फक्त) इतका निधी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्यात येत आहे. संबंधित विभागाने सदर खर्च वर नमूद केलेल्या बाबींवर अंतिमत: खर्ची टाकावा.

३. सदर निधी कोषागारातून आहरीत करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही, याची दक्षता घेण्याच्या सूचना पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने संबंधितांना द्याव्यात.

४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने खातरजमा करावी. तसेच सदर निधी नैसर्गिक आपत्तीमधील पाणी टंचाई कालावधी व्यतिरिक्त अन्य कालावधीतील उपाययोजनांसाठी व इतर बाबींवर खर्च होणार नाही, याची पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने दक्षता घ्यावी.

५. सदर निधी वितरीत करताना ज्या जिल्हयांनी सन २०१९-२० मधील वितरीत निधी १००% रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केली आहेत त्या जिल्हयांनाच वितरीत करावा.

६. टँकरद्वारे करण्यात येणारा पाणी पुरवठा या उपाययोजनेची देयके जी.पी.एस. प्रणाली लावलेल्या टँकरद्वारे पाणी पुरवठा केल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झालेल्या जिल्हयांनाच निधी वितरीत करण्यात यावा.

७. नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून मागील वर्षात घेण्यात आलेल्या विविध योजना/ पाणी पुरवठा विषयक कामे पुर्ण करण्यात आली असल्याचे पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने खात्री करावी.

८. पाणी जीवनावश्यक /अत्यावश्यक बाब असल्याने, त्या आडून गैरप्रकार होणार नाहीत, त्याच-त्याच योजना पुन्हा-पुन्हा दरवर्षी घेण्यात येत नाहीत व त्यावर अनावश्यक खर्च करण्यात येत नाही, याची पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने दक्षता घ्यावी.

९. वितरीत निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट E C S/ R T G S द्वारे वितरीत केला जाईल, याबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने खात्री करावी.

१०. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे/नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. तसेच झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात व कोषागार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी त्रैमासिक पडताळणी पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाने करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यर्पित करावी.

११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने उपरोक्तप्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विभागनिहाय / जिल्हानिहाय आणि उपाययोजनानिहाय माहिती उपलब्ध करुन द्यावी. तसेच सन २०१९-२० मध्ये वितरीत निधीचे एकत्रित उपयोगिता प्रमाणपत्र व प्रस्तुत शासन निर्णयान्वये वितरीत निधीच्या ७५% रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने यापुढील निधीची मागणी करावी.

१२. सदर निधी जरी मदत व पुनर्वसन विभागाकडून अर्थसंकल्पीत करण्यात आला असला तरी त्याचे सनियंत्रण पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे असल्यामुळे सदर निधीचे नियमातील तरतुदीनुसार कोटेकोरपणे लेखापरीक्षण करण्याची जबाबदारी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची राहील. तसेच यानुषंगाने विधीमंडळविषयक, महालेखापाल यांच्या लेखापरीक्षण / लोकलेखा समिती विषयक वा इतर कोणत्याही स्वरुपाचे कामकाज पुर्णत: पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने हाताळणे आवश्यक राहील. वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे लेखे पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने स्वतंत्ररित्या ठेवावेत.

१३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्रमांक१९७/व्यय-९/ २०२०, दिनांक०८/०९/२०२०अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२११५५६५०२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJASHREE MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dcaac1f1b6f31c7c72 3db4deb16f5f2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3922ec7b73b6347 d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2020.10.21 16:00:04 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (आ.व्य.प्र./ मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (आ.व्य.प्र./ मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. सचिव, (आ.व्य.प्र./ मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई
८. मा. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. कोषागार अधिकारी, ( सर्व जिल्हे )
११. वित्त विभाग,(अर्थ-६/ व्यय-९) मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी (ब-१/म-७/म-३) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. निवडनस्ती (का.म-११).